**प्रशासकीय मान्यता**
**नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील जुन्या इमातीतील तळ मजल्यावरील संगणक कक्षाचे नुतनीकरण व विद्युतीकरणाकरीता मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.१३२/कार्या-११**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि. २१ सप्टेंबर, २०१८.

संदर्भ:- १) मा.उच्च न्यायलय यांचे पत्र No.B(W)६००१/१९९०/१३७०/२२७६८, दि.२७.६.२०१८.
२) नगर दिवणी व सत्र न्यायालय,मुंबई यांचे जा.क्र.देखभाल विभाग/पी.जे./७६५/२०१८, दि.२२.३.२०१८.

**प्रस्तावना:-**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील जुन्या इमारतीमधील तळ मजल्यावरील संगणक कक्षाच्या नुतनीकरणासाठी रु. १४,९९,५५९/- व विद्युतीकरणासाठी येणारा रु. ३,८९,००४/- इतक्या रक्कमेची अंदाजपत्रके मा.उच्च न्यायालय,मुंबई यांनी संदर्भाधीन क्र. १ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यतेस्तव व निधी उपलब्धतेसाठी शासनास सादर केलेली आहेत. सदर कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील जुन्या इमारतीमधील तळ मजल्यावरील संगणक कक्षाच्या नुतनीकरणासाठी रु. १६,२०,०६०/- व विद्युतीकरणासाठी येणारा रु. ३,८३,४४४/- अशा एकूण रु. २०,०३,५०४/- (अक्षरी रुपये वीस लाख तीन हजार पाचशे चार फक्त ) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास / खर्चास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | प्रस्तावित केलेली अंदाजित रक्कम रुपये | सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणित केलेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | संगणक कक्षाचे नुतनीकरण | रु.१४,९९,५५९/- | रु.१६,२०,०६०/- |
| २ | विद्युतीकरण | रु.३,८९,००४/- | रु.३,८३,४४४/- |
| एकूण | | रु.१८,८८,५६३/- | रु.२०,०३,५०४/- |

२. यावरील खर्च “मागणी क्रमांक जे-१,२०१४-न्यायदान,१०५-दिवाणी व सत्र न्यायालये,(०१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश (०१)(०१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश (अनिवार्य)(२०१४ ०१६३) २७ लहान बांधकामे ” या उद्दिष्टाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरीता उपलब्ध अनुदानातून/आठमाही सुधारीत वाढीव मागणीद्वारे / पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध होणा-या तरतूदीतून किंवा पुरवणी मागणीद्वारे निधी उपलब्ध करुन भागविण्यात यावा.

३. सदर प्रकरणी प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर विहीत नियमानुसार अनुषांगिक कार्यवाही पूर्ण करावी. तसेच, वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील नियम क्र.२७(२)(अ) मधील तरतुदींचेही पालन करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ.संदर्भ क्र. ४०२/१८/इमा-२, दि.३१.८.२०१८ तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/ १३/विनियम,भाग-२,दि. १७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार .नियम पुस्तिका १९७८,भाग-पहिला,उप विभाग-तीन,अ.क्र.४,परिच्छेद क्र. २७(२)(अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२११५५६०५२४१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2018.09.21 15:58:08 +05'30'

**(सं.सं.नवगिरे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. प्रंबधक (निरीक्षणे- १/२), उच्च न्यायालय, मुंबई.
२. प्रधान न्यायाधीश,नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखपरीक्षा),महाराष्ट्र-१,मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६. विधी व न्याय विभाग,कार्या-२३ व २४,मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती.